**वैध मापन शास्त्र यंत्रणेतील अधिकाऱ्यांना प्रादेशिक विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख, कार्यालय प्रमुख, नियंत्रण अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: वैमाशा-२०२३/प्र.क्र.६०/ग्रासं-३**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई-४०००३२

दि: १७ एप्रिल, २०२३

**वाचा-:** १) शासन निर्णय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्र. वैमाशा-२०२०/प्र.क्र.६५/ग्रासं-३, दि.१४ जानेवारी, २०२१

२) शासन निर्णय, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्र.संकीर्ण-१०१७/प्र.क्र.१५६/नापु-१२ दि.१८ एप्रिल, २०२२

३) शासन निर्णय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्र.वैमाशा-२०२२/प्र.क्र.७४/ग्रासं-३ दि.१४ ऑक्टोबर, २०२२

४) नियंत्रक वैधमापनशास्त्र यांचे पत्र क्रमांक पदनि (१५)/१२२३/प्र.क्र.१०/वैमाशा-१/३७३/ दि.३१ मार्च, २०२३

**प्रस्तावना** :- उपरोक्त क्र.१ येथील शासन निर्णयान्वये अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अखत्यारित असलेल्या वैध मापन शास्त्र यंत्रणेतील काही पदांचे पदनाम बदलण्यात आले आहे. उपरोक्त क्र. २ येथील शासन निर्णय, दिनांक १८ एप्रिल, २०२२ अन्वये अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिनस्त कार्यालयातील पदांचा सुधारित आकृतीबंध निश्चित करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयान्वये क्षेत्रीय कार्यालयामध्ये कामकाजाचे स्वरूप, जबाबदारी, कामाचा व्याप इत्यादी बाबी विचारात घेऊन विभाग, जिल्हा, तालुका स्तरावर संवर्गनिहाय पदसंख्या निश्चित करण्याच्या सूचना दिल्या आहेत. यास्तव संदर्भ क्रमांक ३ येथील दिनांक १४ ऑक्टोबर, २०२२ च्या शासन निर्णयान्वये वैध मापन शास्त्र यंत्रणेतील मंजूर पदांचे क्षेत्रीय स्तरावर फेरवाटप करण्यात आले आहे. त्यानंतर दिनांक २१ फेब्रुवारी, २०२३ च्या अधिसूचनेन्वये वैध मापन शास्त्र अधिकाऱ्यांचे स्थानिक कार्यक्षेत्र निश्चित करण्यात आले आहे. उपरोक्त शासन निर्णय तसेच अधिसूचनेची अंमलबजावणी दिनांक १ एप्रिल, २०२३ पासून करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांनी संदर्भ क्रमांक ४ येथील पत्रान्वये वैध मापन शास्त्र यंत्रणेतील पदांच्या फेरवाटपांच्या अनुषंगाने महाराष्ट्र नागरी सेवा नियम, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ आणि मुंबई वित्तीय नियम, १९५९ या नियमाच्या अंमलबजावणीच्या प्रयोजनार्थ व इतर सर्व बाबीसाठी वैध मापन शास्त्र यंत्रणेतील अधिकारी यांना नव्याने प्रादेशिक विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख, कार्यालय प्रमुख,

नियंत्रण अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यानुसार यापूर्वी घोषित केलेले प्रादेशिक विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख, कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी व नियंत्रण अधिकारी घोषित करण्याबाबतचे आदेश अधिक्रमित करून ते नव्याने घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -:**

वैध मापन शास्त्र यंत्रणेतील पदांच्या फेरवाटपांच्या अनुषंगाने वैध मापन शास्त्र यंत्रणेसाठी सोबतच्या परिशिष्ट "अ" नुसार एकूण ५२ अधिकाऱ्यांना त्यांच्या पदनामासमोर दर्शविल्यानुसार महाराष्ट्र नागरी सेवा नियम, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ आणि मुंबई वित्तीय नियम, १९५९ या नियमाच्या अंमलबजावणीच्या प्रयोजनार्थ व इतर सर्व बाबींसाठी प्रादेशिक कार्यालय प्रमुख, कार्यालय प्रमुख, नियंत्रण अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

यापूर्वी शासनामार्फत व नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांच्या कार्यालयामार्फत प्रादेशिक कार्यालय प्रमुख, कार्यालय प्रमुख, नियंत्रण अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याकरिता निर्गमित केलेले शासन निर्णय / आदेश या निर्णयान्वये अधिक्रमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०४१७१५३८०९४६०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

CHARUSHILA
CHANDRAKANT
TAMBEKAR

Digitally signed by CHARUSHILA CHANDRAKANT TAMBEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=332dfd6e6db0a06570cca25f9c39add2bebc7d207b3405d11e474330d0a9e014, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2B0496C0C213A3F50C6522CC39AE5DE95E1150AC3287E89C21B1422E313820A2, cn=CHARUSHILA CHANDRAKANT TAMBEKAR
Date: 2023.04.17 17:16:48 +05'30'

**( चारुशीला तांबेकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. महालेखापाल (लेखापरीक्षा) १, महाराष्ट्र, मुंबई
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १, महाराष्ट्र, मुंबई
४. महालेखापाल (लेखापरीक्षा) २, महाराष्ट्र, नागपूर
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) २, महाराष्ट्र, मुंबई
६. सर्व विभागीय, सह नियंत्रक, वैध मापन शास्त्र
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
९. सर्व उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र
१०. निवडनस्ती, कार्यासन ग्रा.सं.-३.

**शासन निर्णय क्रमांक : वैमाशा-२०२३/प्र.क्र.६०/ग्रासं-३ दिनांक- १७ एप्रिल, २०२३ सोबतचे**

**परिशिष्ट "अ"**

वैध मापन शास्त्र यंत्रणेतील प्रादेशिक विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख, कार्यालय प्रमुख, नियंत्रण अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी दर्शविणारा तक्ता.

| अ. क्र. | यंत्रणेतील अधिकारी यांचे पदनाम | घोषित करण्यात येत असलेले प्रादेशिक विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख, कार्यालय प्रमुख, नियंत्रण अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|
| १ | सह नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई | कार्यालय प्रमुख व नियंत्रक अधिकारी |
| २ | सह नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई महानगर विभाग | प्रादेशिक विभाग प्रमुख/प्रादेशिक कार्यालय प्रमुख व नियंत्रक अधिकारी |
| ३ | सह नियंत्रक, वैध मापन शास्त्र, कोकण विभाग | प्रादेशिक विभाग प्रमुख/प्रादेशिक कार्यालय प्रमुख व नियंत्रक अधिकारी |
| ४ | सह नियंत्रक, वैध मापन शास्त्र, पुणे विभाग | प्रादेशिक विभाग प्रमुख/प्रादेशिक कार्यालय प्रमुख व नियंत्रक अधिकारी |
| ५ | सह नियंत्रक, वैध मापन शास्त्र, नाशिक विभाग | प्रादेशिक विभाग प्रमुख/प्रादेशिक कार्यालय प्रमुख व नियंत्रक अधिकारी |
| ६ | सह नियंत्रक, वैध मापन शास्त्र, छत्रपती संभाजीनगर विभाग | प्रादेशिक विभाग प्रमुख/प्रादेशिक कार्यालय प्रमुख व नियंत्रक अधिकारी |
| ७ | सह नियंत्रक, वैध मापन शास्त्र, अमरावती विभाग | प्रादेशिक विभाग प्रमुख/प्रादेशिक कार्यालय प्रमुख व नियंत्रक अधिकारी |
| ८ | सह नियंत्रक, वैध मापन शास्त्र, नागपूर विभाग | प्रादेशिक विभाग प्रमुख/प्रादेशिक कार्यालय प्रमुख व नियंत्रक अधिकारी |
| ९ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई | आहरण व संवितरण अधिकारी |
| १० | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई महानगर विभाग | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी |
| ११ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई जिल्हा क्र.१ | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| १२ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई जिल्हा क्र.२ | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| १३ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई जिल्हा क्र.३ | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| १४ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, कोकण विभाग | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी |
| १५ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, ठाणे जिल्हा क्र.१ | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| १६ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, ठाणे जिल्हा क्र.२ | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| १७ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, पालघर जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| १८ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र,रायगड जिल्हा क्र.१ | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| १९ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, रायगड जिल्हा क्र.२ | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| २० | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, रत्नागिरी-सिंधुदुर्ग जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| २१ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, पुणे विभाग | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी |
| २२ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, पुणे जिल्हा क्र. १ | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| २३ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, पुणे जिल्हा क्र. २ | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| २४ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, पुणे जिल्हा क्र. ३ | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| २५ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, पुणे जिल्हा क्र. ४ | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| २६ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, सातारा विभाग | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |

| | | |
|---|---|---|
| २७ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, सांगली जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| २८ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, सोलापूर जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| २९ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, कोल्हापूर जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| ३० | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, नाशिक विभाग | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी |
| ३१ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, नाशिक जिल्हा क्र.१ | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| ३२ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, नाशिक (ग्रामीण) जिल्हा क्र.२ | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| ३३ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, धुळे-नंदुरबार जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| ३४ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, जळगांव जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| ३५ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, अहमदनगर जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| ३६ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, छत्रपती संभाजीनगर विभाग | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी |
| ३७ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, छत्रपती संभाजीनगर जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| ३८ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, परभणी-हिंगोली जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| ३९ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, बीड जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| ४० | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, नांदेड जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| ४१ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, जालना जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| ४२ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, लातूर-धाराशिव जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| ४३ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, अमरावती विभाग | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी |
| ४४ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, अमरावती जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| ४५ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, अकोला-वाशिम जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| ४६ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, बुलढाणा जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| ४७ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, यवतमाळ जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| ४८ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, नागपूर विभाग | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी |
| ४९ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, नागपूर जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| ५० | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, नागपूर (ग्रामीण) वर्धा जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| ५१ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, भंडारा-गोंदिया जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |
| ५२ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, चंद्रपूर-गडचिरोली जिल्हा | कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी |